नवनाथ भक्तिसार अध्याय चौदावा

मागील अध्यायांत हिमालय परिसरातील बद्रीकावानात आपला शिष्य कानिफायांस उग्र तपाला बसवून गुरु जालिंदर तीर्थाटनासाठी निघाला. जालिंदर जतीचा एक महत्वाचा परिपाठ असे की कोणत्याही गावात प्रवेश करण्यापूर्वी गवत कापून त्याचा भार डोक्यावर घेऊन जात आणि तो गाईंना खाण्यासाठी ठेवून पुढे आपल्या दिनक्रमाचे आचरण करीत असे. वायुदेवाचा पुत्र अग्नीदेव आणि अग्नीदेवाचा पुत्र जालिंदर, तर या जालिंदरला श्रम पडू नयेत म्हणून अग्नीने आपल्या पित्याला विनंती केली की जालिंदरच्या डोक्यावरील गवताच्या भाऱ्याचे वजन त्याच्या शिरावर न पडता तुझ्या सहकार्याने तो अधांतरीच तरंगत रहावा. हे दृश्य गावकऱ्यांना अत्यंत विस्मित करणारे असायचे. हेलापट्टण राज्यात राणी मैनावतीने राजमहलातून हा चमत्कार पहिला आणि तिने ह्या सिद्धीने प्राप्त झालेल्या योग्याचे एनकेन प्रकारे आणि कठोर परिश्रमाने आशीर्वाद मिळविले.

राजमाता मैनावतीला ब्रह्मज्ञान प्राप्त झाले. तरीही तिच्या अंतरातील स्त्रीसुलभ मातृत्वाची ममता, मुलाविषयी, अर्थात राजा गोपीचंदासाठी अस्वस्थ करीत होती. पती त्रिलोचन महाराजांवर काळाने झडप घातली तसेच कधी ना कधी आपल्या पुत्राच्या बाबतीत होणार हे निश्चित. काळाच्या दाढेतून आपल्या पुत्राला कसे मुक्त करावे; या काळजीने तिच्या आतड्यांना पीळ पडत असे. हातांचा पाळणा आणि नेत्राचा दिवा करून लहानाचा मोठा केलेला मदनासारखा सुस्वरूप पुत्र एक दिवस चितेत भस्म होईल. पाड लागलेल्या रसाळ आंब्याला जशी आंतूनच कीड लागते त्याचप्रमाणे काळरूपी कीड आयुष्यात उशाशी बसून आहे. विषयभोगाच्या आधीन झालेल्या कृद्र जनांना अमृत सुद्धा बेचव लागते कारण जगत असलेल्या जीवाला मृत्यूचा शाप असल्याने तो स्वतःच मृत्युच्या समीप जाण्याची घाई करीत असतो. कचाने दुर्धर कष्ट सहन करुन प्राप्त केलेली संजीवनी देवयानीच्या शापामुळे निष्फळ झाली. तसा ह्या देहाला मारण्याचा शाप आहे. प्रत्येकाच्या उशाशी बसून काळ झडप घालण्याची प्रतीक्षा करीत आहे. सुगंधी, मऊ आणि मुलायम फुलांच्या शय्येवर निद्रेस जाताच, फुलांतील सर्पानेच दंश करून प्राण घ्यावेत तसा काळ संधी मिळताच दंश करणार आहे. आंधळ्याचे सोंग करून काणाडोळा केल्याने मृत्यु टळणार नाही. आपल्या मुलाला भौतिक निद्रेतून कसे जागे करावे, या विवंचनेत ती माता अहोरात्र तळमळत होती.

माघ महिन्यातील कडाक्याच्या थंडीचे दिवस. राजप्रासादाच्या सज्जात राजमाता मैनावती उन्हामध्ये केस वळवत बसली आहे. खालील प्रांगणात राजा गोपीचंद स्नानासाठी बसला आहे. चंदनाच्या चौरंगावर बसून राजाचे दंतधावन चालले आहे. स्नान घालण्यासाठी सर्व राण्या गोलाकार उभ्या राहिल्या आहेत. सुगंधी उटणे आणि उष्णोदक तयार आहे. अलंकार आणि वस्त्रे उतरवून कटीवस्त्र परिधान केलेला राजबिंडा राजा, सुवर्णकोंदणातील रत्नप्रमाणे शोभत होता. सज्जातून राजमाता डोळेभरून पुत्राला न्याहाळीत आहे. या सुंदर देहाची एक दिवस काळाकडून स्मशानात राख होणार आहे; ह्या विचाराने तिला हुंदका आवरता आला नाही. डोळ्यांतून टपटप अश्रू पडले. वाऱ्याच्या झोताने अश्रूबिंदू राजाच्या उघड्या देहावर पडले. ते साधे अश्रू नव्हते तर एका प्रेमळ मातेचे अश्रू होते. कृतांत भयापासून मुक्त करणारे संजीवनी तीर्थ होते. रखरखीत उन्हाने तप्त झालेल्या धरणीवर बरसणारे शीतल मेघबिंदू होते. गांजलेल्या गरीबाला प्राप्त झालेली कामधेनु होती. अशा प्रकारे मातेच्या नेत्रातील पवित्र गंगाजल राजा गोपीचंदच्या देहावर पडून त्यांचा थंडगार स्पर्श जाणवताच त्याने आकाशाकडे पहिले. कोठेही ढग नव्हते की पर्जन्यवृष्टीची शक्यताही नव्हती. मग थंड

पाण्याचे टपोरे थेंब कुठून आले? चौफेर नजर फिरवल्यावर त्याला रुदन करणारी आई दिसली, तिच्या डबडबलेल्या डोळ्यांतून अश्रूबिंदू टपकत होते. काय झाले असावे? आई का रडत आहे?

चिंताग्रस्त होऊन राजा गोपीचंद उठला आणि त्वरेने राजमाताच्या जवळ आला. तिच्या चरणांवर माथा टेकून त्याने विचारले, "माते! काय झाले? का अश्रू ढाळत आहेस? माझ्यासारखा राजा तुझा पुत्र असताना तुला कसले दुःख आहे? अनेक नृपाळांना सहजतेने पराजीत करून त्यांचे गर्व हरण करणारा मी! आणि माझी माता रडत आहे? तुझा कोणी अपमान केला असेल तर त्याचे निर्दालन करीन. कोणी डोळे वटारून पहिले असेल तर त्याचे डोळे काढून तुझ्या हातावर ठेवीन. कोणी बोटाने दटावले असेल तर त्याची बोटे छाटली जातील. माझ्या अठ्ठावीस पटराण्यांपैकी कोणी अपशब्द बोलला असेल तर त्यांचा शिरच्छेद करीन किंवा माझ्याकडून तुझ्या सेवेत काही न्यून घडले असेल तरी सांग! त्याच न्यायाने मी शिक्षा भोगेन, सांग माते, कसले दुःख तुला सलते आहे? तुला असे वाटते की काय, काम अवघड आहे. तिथे मुलाची शक्ती कमी पडेल, तरी माते मुळीच अविश्वास धरू नकोस, मी माझे प्राण पणाला लावून तुझी मनोकामना पूर्ण करीन तुझ्या उदरी जन्म झाला म्हणून मी राजपद भोगीत आहे. तुझे दुःख मी दूर करू शकत नसेन तर माझा जन्म कुत्र्यामांजरांपेक्षाही हीन आहे. धिक्कार असो असल्या जन्माचा! जन्मदात्यांना दीनवाणी, दुःखात टाकून स्वतः राजवैभवात लोळायचे; कांतेला वस्त्रालंकाराने सजवून मातेला जीर्ण, फाटके वस्त्र नेसण्यास भाग पाडावयाचे; कांतेला मिष्टान्न, सुग्रास भोजन आणि माता उपाशी, कांतेला बसावयास उच्चासन आणि मातेला भुईवर लाथाडायचे. कांतेला रंभेसामान नटवून मातेला पिशच्चाच्या अवतारात ठेवायचे. जिने जन्म देऊन जग दाखवले तिला करंटी म्हणून हिणवायचे; कांतेवर सर्वसुखाची बरसात करून मातेला दुःखाश्रू ढाळावयास लावायचे, कांतेला गोड गोड बोलायचे आणि मातेला कटू शब्दांत वाकताडण करावयाचे, स्वतः राजासारखे ऐशोआरामात राहावयाचे आणि मातापित्यांना दैनावस्थेत ठेवायचे, आपण कंठात, शिरावर अलंकार परिधान करावयाचे आणि पित्याच्या शिरावर खलबत्ता मारावयाचा; आपण स्वादिष्ट खायचे आणि पिता भिक्षा मागतो, असा जर कुणी पुत्र वागत असेल तर असला दुष्ट पुत्र धरणीला भार असून तो मेलेला बरा. माते! माझ्या हातून असे काही कळत नकळत घडले आहे काय? असल्यास सांगावे. मी तुझ्या सुखासाठी प्राणत्याग सुद्धा करीन, विश्वास ठेव. तुला कसले दुःख आहे ते कथन कर!"

पुत्राची ही मातृपितृ भक्ती पाहून, त्याचे सत्शील विचार ऐकून राजमाता आनंदीत झाली. त्याचे कल्याण चिंतून म्हणाली, "पुत्रा गोपीचंदा! तुझा गैरसमज होत आहे. तुझ्या मातृभक्तीबद्दल मला संदेह नाही. शत्रूंचा नाश करणारा तू साक्षात पराक्रमी सूर्य असल्याने कोणता अंधःकार मला पिडा देईल? तुझ्यासारख्या परीस माझ्या हृदयात असताना दारिद्र्य स्वप्नांतसुद्धा येणार नाही. तुझ्या पराक्रमाने अनेक भूपाल चरणदास होऊन लोळत असतांना मला क्रोधाने दटाविणारा कोण आहे? तुझ्यासारखा प्रतापी नरसिंह माझ्या रक्षणासाठी असताना बलाढ्य गजराज सुद्धा मला काय करू शकेल? असे विपरीत कधी घडले आहे काय? परंतु बाळा! मी तुझी आई आहे! पुत्राच्या चिंतेने आईचे काळीज सदैव धडधडत असते. तुझ्यासारखा पराक्रमी सूर्य माझ्या पोटचे पुत्ररत्न असल्यामुळेच माझे काळीज सतत पोखरले जात आहे. तुझे पिताश्री तुझ्यासारखेच कीर्तीसूर्य होते. परंतु काळाने त्यांचा अस्त केला. रूपसुंदर आणि गुणसागर अशा तुझ्या पित्याचा देह वडवानल चितेत भस्म झाला. निष्प्राण देहाच मांस जळाले. अस्थीही लकडासारख्या जळत राहिल्या. राजबिंड्या देहाची राखरांगोळी झाली. माझ्या नजरेसमोर ते भयानक दृश्य अजून दिसत आहे आणि त्यामुळे माझा जीव जळत आहे. मृत्यु हा शक्तिमान आहे, एक दिवस तुझेही तुझ्या पित्यसारखे होईल या भयाची धास्ती मला

बसली आहे. उंदरावर झडप घालण्यासाठी मांजर किंवा मासा पकडण्यासाठी बगळा टपून बसतो. त्याप्रमाणे मानवावर झडप घालून त्याचे प्राण हरण करण्यासाठी काळ टपून बसला आहे. तो काळरुपी वाघ, भक्तियोगरुपी आध्यात्मिक पिंजऱ्यात कोंडून त्याला दुबळा करावा. जीवघेणा डंख मारणाऱ्या काळरूपी वृश्चिकला योगशक्तीने ठेचलयास डंख बाधा होणार नाही. तू या नरदेहाची माती करू नकोस. मृत्यूला जिंकून अमर व्हावेस अशी माझी इच्छा आहे. माझी आंतरिक तळमळ आहे. ब्रम्हर्षी नारद, श्री व्यास, शुक महाराज, कौशिक, याज्ञवल्क आणि रामाचा दास या भगवद् भक्तांप्रमाणे तू सुद्धा ब्रह्मसनातन होऊन माझा पुत्र म्हणून चिरंजीव व्हावेस अशी माझी इच्छा आहे, म्हणून माझ्या डोळ्यांत अश्रू आले होते.

आपला पुत्र अमर व्हावा म्हणून मातेने हृदय पिळवटून केलेला विचार ऐकून गोपीचंद म्हणाला, “मातोश्री! आपण सत्य कथन केले आहे पण आज असा भक्तीमार्गाचा ब्रह्मोपदेश करून अमरपदाची प्राप्ती मिळवून देणारा प्रज्ञावंत असा गुरुदेव अस्तित्वात असेल का?

राजमाता मैनावती म्हणाली, “होय! पुत्रा असा गुरु आपल्या नगरीतच उपलब्ध आहे. जालिंदरनाथ नावाचा ब्रह्मज्ञानी, महायोगी असे तपस्वी आपल्याच नगरीत आहेत. काया, वाचा, मनाने तू त्यांना शरण जा, म्हणजे तुला ब्रह्मसनातन करून चीरांजीवीत्वाची प्राप्ती करून देतील ते. मुला! हे राजवैभव, राज्यकारभार, राजपरिवार हे सारे अशाश्वत आहे. हे सगळी माया असून नाशवंत आहे.”

त्यावर प्रतिसाद देताना त्रिलोचनपुत्र गोपीचंद म्हणाला, “माते, आपल्या इच्छेप्रमाणे मी त्यांना शरण जाऊन योगाभ्यास करीन. तथापि हे सर्व राजवैभव, सुखसंपत्ती, परिवार, आप्तवर्ग, सगेसोयरे या सर्वांना एका क्षणात सोडून कसा जाऊ? तरी आणखी बारा वर्षे मला हे राजवैभव उपभोगू दे मग आपल्या इच्छेप्रमाणे कसून योगाभ्यास करीन ध्रुव बाळासारखे अढळपद प्राप्त करून जगात कीर्ती मिळवीन.

राजमाता म्हणाली, “वत्सा! क्षणभरचा भरवसा देता येत नाही, तर बारा वर्षांचे काय सांगावे? चित्त, वित्त आणि जीवित हे अशाश्वत आणि क्षणभंगुर आहे. पाण्यावरील बुडबुडा आहे. क्षणभरात काय होईल ते कळत नाही. वांझोटीच्या पुत्रांना वाडा बांधावा आणि मृगजळाने तहान भागावी, असे हे सर्व लटके आहे. स्वप्नात इंद्रपद भोगले तरी ते खरे नसते, तो भास असतो. सर्व चराचर त्या भासालाच भुलले आहेत शुक, दत्तात्रेय, कपिलमुनी, व्यास, वसिष्ठ, प्रल्हाद, आदी मोजक्याच विभूतींनी काळावर विजय मिळवला आहे. बाकीचे यमदुतांच्या सापळयात सापडले आणि सापडत राहणार आहेत. अर्थात कोणत्या क्षणी काय घडेल याचा अंदाज वर्तवणे शक्य नसल्याने अमुल्य वेळ दवडू नकोस.

आईच्या आणि तिच्या सुपुत्राचा संवाद पट्टराणी कुमावंतीच्या कानी पडताच तिने सावध होऊन विचार केला, “अरे देवा! ही आई आहे की वैरीण? पराक्रमी पुत्राला राजपद, राजवैभव सोडावयास सांगतेय! त्याने जोगी व्हावे असा आग्रह करते आहे. रामासारख्या पुत्राला वनवासात धाडणारी, पतीचा प्राण घेणारी आणि चारही पुत्रांना देशोधडीला लावणारी कैकयीचीच ही प्रतिकृती म्हणावी काय? आमच्यावर देवांची अवकृपा झाली असावी. दैवतांचा क्षोभ झालाय की काय? दुष्ट स्वप्ने पाहून, त्याचा अर्थ विनाश होणार असा तर्क केला, तर देवाची अवकृपाच समजावी. आपल्या हाताखालचे दास, दासी, सेवक आज्ञा उल्लंघन करून उलटे बोलू लागले तर समजावे देव आपल्यावर कोपला आहे. संकटकाळीसाठी जपूण ठेवलेली धनराशी ऐनवेळी सापडू नये यालासुद्धा परमेश्वरी कोप समजावा. आपण सभेमध्ये सोळाआणे सत्य

कथन केले असतानाही लोकांना ते असत्य वाटून आपणावर चिखलफेक केली गेली तो ही देवक्षोभ समजावा. आपण एखाद्याला संकटकाळी उसने दिलेले द्रव्य मागावयास गेलो तर त्यानेच विचारावे की, "मी तुझ्या बापाचे देणे लागतो काय?" असे घडल्यास देवक्षोभ जाणावा. शत्रुनाश करणारी विद्या जर युद्धभूमीवर आठवली नाही तरी देवक्षोभ समजावा. कधीही दोष नसतांना राजसत्तेने शिक्षा केली किंवा बसल्या जागेवर विनाकारण नसत्या भानगडी निर्माण झाल्या तर देवक्षोभ जाणावा. दुबळ्या शत्रूपुढे जर आपणावर शरणागती पत्करण्याचा जर प्रसंग आला तर तो देवक्षोभ. ज्यांचावर आपण उपकार केले आहेत तेच जर कृतघ्न होऊन उलटले आणि म्हणू लागले, "अरे, याचे तोंडही पाहू नका!" आणि टाळू लागले तर देवक्षोभ समजावा. कुणाच्याही अध्यातमध्यात नसतांना दुसऱ्याचे झेंगट आपल्यावर येऊन निस्तरण्याचा प्रसंग आल्यास देवक्षोभ समजावा. आजपर्यंत आपल्या आज्ञेत वागणारे कुटुंबातील सदस्य जर अनुज्ञा करून एकमेकांशी कलह करू लागले आणि आपण हतबल झालो तरी तो देवाचा क्षोभच समजला पाहिजे. अशा पद्धतीने ही कैकयी वृत्तीची माता आपल्या पुत्राने कान भरीत आहे. हे काही बरे नाही. अशाने विनाश निश्चित आहे. हा बुद्धीभेदाचा अग्नी राजवैभव जाळून त्याची राखरांगोळी करील हे निश्चित! असा विचार करीत कुमावंती महालात गेली.

महाराणीच्या समर्पक उदाहरणांनी थक्क झालेला राजा गोपीचंद प्रतिसाद देतांना म्हणाला, "माते, आपली इच्छाच आहे तर तिचा आदर करून मी स्वतः स्वामींना भेटतो. त्यांचे कर्तुत्व पारखून घेईन. ते माझे कल्याण करण्यास समर्थ असल्याची खात्री झाली तर मी तन मन धन त्यांच्या चरणी वाहून राजवैभवाचा त्याग करीन. आपण वृथा शोक करू नये." असे म्हणून राजा गोपीचंद स्नानासाठी खाली आला.

अस्वस्थ झालेल्या पट्टराणी कुमावंतीने, राजाच्या खास मर्जीतल्या पाच सात राण्यांना स्वतःच्या महालात पाचारण केले. सुवर्नासनावर आसनस्थ करून त्यांच्या पुढ्यांत विड्यांचे तबक फिरविण्यात आले. तांबुलपान करीत महाराणी कुमावंती त्यांना म्हणाली, "सख्यांनो! एक गंभीर विषय मी आपल्यासमोर ठेवत आहे. आपल्या राजवैभवावर गहन आरिष्ट कोसळणार आहे. त्याची जाणीव करून देण्यासाठी मी तुम्हाला बोलावले आहे. राजमाता मैनावती हाच आपला शत्रू आहे याची मला खात्री झाली आहे. साक्षात राजमातेने महाराजांना राजेपद सोडून संन्यासी करण्याचा घाट घातला आहे. जालिंदर नावाचा कुणी एक विक्षिप्त जोगडा गावात आला आहे आणि त्याचा अनुग्रह देऊन राजांना संन्यास दीक्षा देण्याचे ठरत आहे. अशी ही वैरीण राजमाता आपल्या महापराक्रमी पती साक्षात सूर्यालाच अस्तंगत करावयास सिद्ध झाली आहे. राजानेच संन्यास घेतल्यास राज्यात अंधार पडायला कितीसा वेळ लागणार आहे? आपण ज्यांच्या वर आसनस्थ झालो आहोत ती ही सुवर्णासने, थाटमाट, हे वैभव सारे काही नष्ट होईल. मग आपला सर्वजणींचा काय उपयोग? काहीतरी उपाय शोधला पाहिजे. अगं सख्यांनो, राजस्त्रीयांनो अग्नीच्या ठिणगीला कधी शुल्लक मानु नये. वेळीच विझवली नाही, तर हा राजमहाल जळून भस्म होईल. उशा पायांशी विषारी सर्प फुत्कार सोडत असतांना तुम्हाला निद्रा येते कशी? अशाने प्राण कसे वाचतील? राजाच गोसावी झाल्यावर राण्यांना कोण आणि कशासाठी सांभाळेल? असो, आता राजमातेचा हा कट उधळण्यासाठी काय केले पाहिजे ते ठरावा."

सर्वजणी बुद्धीला ताण देऊन विचार करू लागल्या याच विषयावर चर्चा, सल्लामसलत आणि खलबतं सुरु राहिले पण प्रदीर्घ काळ कशावरच एकमत होत नव्हते. शेवटी कुमावंती म्हणाली, "मला यावर एक उपाय दिसतो आहे, इकडे लक्ष द्या! महाराज आणि राजमाता यांना विचारात न घेता जालिंदरनाथ नावाची जी मधली कडी आहे तिचाच निकाल लावावा. तिला नष्ट केले की ही शृंखलाच भंग होईल. परंतु राजमातेची जालिंदरावर भक्ती असल्याने, सामान्य व्यक्ती

त्याला इजा करावयास धजणार नाही, शिवाय यांत आपल्याया सुद्धा धोका संभावतो. त्यापेक्षा सर्वशक्तिमान अशा आपल्या पतीराजालाच जालिंदरबाबत वेडेवाकडे किल्मिष भरवून कोपायमान केल्यास राजाच त्याचे निर्दालन करील आणि आपला हेतूही साध्य होईल." अशा प्रकारे राजाला कसे क्रोधीत करावयाचे आणि जालिंदर जोग्याचा वध कसा घडवून आणावयाचा याचा आराखडा पक्का ठरल्यावर या पट्टराण्यांची बैठक संपली.

महाराज गोपीचंद राजकारभार, राजकारण व इतर दिवसभराचे कामकाज आटोपून, मान सन्मानांचे आदानप्रदानादी कार्यक्रम करून सायंकाळी रंगमहालात आले. करमणुकीची बैठक आटोपून पाकशाळेत जाऊन भोजन घेतले आणि विश्रांतीसाठी अंतःपुरात आले. कुमावंती ही सर्वात आवडती राणी म्हणून प्रथम तिच्याच महालात गेले. तिने राजाला सुवर्णासनावर बसवून षोडशोपचारे पूजन करून वंदन केले. गोड गोड बोलून प्रेमचेष्टा केल्या. देहभान हरपून रथीसुख दिले. राजा अतिशय प्रसन्नावस्थेत असताना तिने लाडिकपणे विषय काढला. "प्राणनाथ एक गोष्ट सांगावयाची आहे पण सांगावे तरी संकट आणि न सांगावे तरीही संकटच! अर्थाचा अनर्थ व्हयाचा. मला तर भय वाटते कारण कानांनी जे ऐकले ते फारच भयंकर आणि राजघराण्याशी संबधीत आहे आपण जर रागावणार नसाल आणि अभय देत असाल तर जे काही ऐकले आहे ते निर्भय होऊन सविस्तर कथन करीन." राजा गोपीचंद तिला प्रेमाने आलींघन देत म्हणाला, "प्रिये! मी तुझ्यावर कसा रागवेन! मी तुला अभय वचन देतो. निर्भय होऊन सत्य कथन कर." मग कुमावंती सांगू लागली, "महाराज! राजमातेने एक अघोरी कारस्थान आखले आहे. विषयवासनेच्या उन्मादात तिने जालिंदर नावाच्या एका जोग्याला वश केले आहे. रोज रात्री त्याला भेटावयास जाऊन रात्रभर त्याच्याजवळ थांबते आणि पाहटे महालात परतते पण तुम्ही त्या दोघात अडसर ठरत आहात म्हणून तुमचा काटा काढण्यासाठी तुम्हाला संन्यास दीक्षा देऊन तीर्थयात्रेला, तपश्चर्येला पाठवण्याचे षड्यंत्र आकार घेत आहे. तुम्ही दूरदेशी जाताच जालिंदराला गाडीवर बसवून तो राजा आणि मैनावती राणी असे राजभोग उपभोगण्याचे बेत आहेत. परंतु आपण भाग्यवान आहात आणि आमच्या प्ररब्धातील सौभाग्य योग सशक्त असल्याने त्यांचा हा गुप्त कट कानावर पडला आणि तुम्हास सांगितला महाराज! सावध व्हा फार मोठा धोका आहे."

कुमावंतीचे बोलणे ऐकून राजा गोपीचंद अतिशय संतापला त्याचा क्रोधाग्नी जालिंदराचा घास घेणार हे निश्चित झाले. निवडक विश्वासू सेवकांना आणि कामाठ्यांना घेऊन काळोख्या रात्री राजा गोपीचंद, जालिंदर जिथे वास करून होता तिथे आला. कामाठ्यांकरवी विहिरासारखा खोल खड्डा खणला. त्या सर्वांनी जालिंदरनाथला उचलून त्यात टाकले. वरून घोड्याची लीद, घाण, कचरा, माती टाकून जिवंत अवस्थेत त्याचे दफन केले. या घटनेची चकार शब्दानेही वाच्यता करावयाची नाही, तसे केल्यास मृत्यु अटळ! अशी ताकीद दिल्याने ही घटना गुप्त राहणार होती. मध्यरात्र उलटल्यानंतर. ते सर्वजण राजवाड्यात माघारी आले.

सूर्योदयानंतर तेथील रहिवाश्यांना साधू महाराजांचे दर्शन झाले नाही. त्यंनी विचार केला की, गेला असेल उठून. संन्याशाचे काय सांगावे! मनाला येईल तेथे बसावे, मनात येईल तेव्हा निघून जावे. संन्याशी आणि सरिता सतत प्रवाही असतात. एका जागी न थांबणे त्यांचा गुणधर्म आहे. महाराणी मैनावतीच्या कानावर साधू महाराज नाहीसे होण्याची अफवा हस्ते परहस्ते सेविकांच्या माध्यमातून आल्या होत्याच. ते ऐकून तिला फारच दुःख झाले. "गुरुदेव असे अचानक का निघून गेले? कोठे गेले असतील? कधी गेले आणि कधी येणार? पुन्हा भेट होईल का? काहीच न सांगता गेले. आता माझ्या पुत्राला अनुग्रह कोण देणार? गुरुमहाराज! गुरुमहाराज!!" असा आक्रोश फिरीत ती शोक करू लागली.

त्यानंतर राणी मैनावती कित्येक दिवस ती जागा दुरूनच पाहून महाराज दिसले नाहीत तर निराश होऊन माघारी फिरत असे. पण राजमहालामधल्या राणीवसामधील कुमावंती आणि इतर राजस्त्रीया; जोगी निघून गेला म्हणून आनंदित होत्या.

त्या काळोख्या रात्री जिवंतपणे गाडले गेलेल्या जालिंदरनाथांनी मात्र पुढील भविष्य लक्षात घेऊन संयम, शांतता आणि मौन राखले. खरं तर ईश्वरी वरदान मिळवलेल्या यतीला दफन करण्याची कृतांत काळाचीही क्षमता नव्हती. खड्ड्यात पडताच ते वज्रासन घालून बसले, आकाशास्त्राने वरची लीद, कचरा, माती वरच्यावर तोलून स्वतःभोवती पोकळी निर्माण केली. तसेच वज्रास्त्राने कठीण असे सुरक्षा कवच निर्माण केले आणि प्रतापी अग्नीपुत्र जालिंदरनाथ धरणीच्या गर्भात ध्यानस्थ होऊन बसले.

फलश्रुती: ह्या अध्यायाच्या पठणाने कारागृहातून मुक्तता होईल.